**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०२३/प्र.क्र.१४६/मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०५.०४.२०२३.

<u>संदर्भ</u>:- १.शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.आढावा १००२/(३३५/२००२) आ (प्रशि), दि.०६.०२.२००३.
२. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.मुदतवाढ २०२२/प्र.क्र.२५०/मोप्र-२, दि. २९.८.२०२२.
३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.५२७/आस्था-८/मुदतवाढ २०२३-२४/२०२३, दि. ०८.०२.२०२३.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि. ०८.०२.२०२३.

<u>प्रस्तावना :-</u>

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर पदांना संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२२ ते ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यांत आली आहे. संदर्भ क्रमांक ४ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

आता संदर्भीय क्रमांक ३ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या विवरणपत्र - “अ” मध्ये दर्शविल्यानुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. पर्यंत खाली अटींच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे कर्मचारी कार्यरत असे पर्यंत चालू राहतील.

३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजूर असतील.

४) उपरोक्त सर्व पदे व्यपगत झालेली नसतील.

५) यानंतर शासनास सादर करण्यात येणारे विहित प्रपत्र प्रमाणपत्र त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत प्रस्ताव विहित प्रपत्र, प्रमाणपत्रासह सादर करण्यात यावेत.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (८०), सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भाग भांडवली अंशदान, (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (अनिवार्य)(संगणक संकेतांक ४७०१ आय १७१)(अनिवार्य) या लेखाशिर्षाखालील खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०८.०२.२०२३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१८५०१४५७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ABHAY KESHAORAO YEDSIKAR

Digitally signed by ABHAY KESHAORAO YEDSIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B9CED1C6530163B6C7A287499C459AF544860D5330D82DBE50D22D67820C373, cn=ABHAY KESHAORAO YEDSIKAR
Date: 2023.04.10 18:55:29 +05'30'

**( अभय येडसीकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत:- विवरणपत्र - "अ"**

**प्रत:- सहपत्रासह,**

१) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई,

२) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,

३) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,

४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,

यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष चूकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील.

५) मोप्र-२ संग्रहार्थ

**विवरणपत्र -अ**

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ- २०२३/प्र.क्र. १४६ /मोप्र-२, दि. ०५.०४.२०२३ चे सहपत्र**

**नियत अस्थायी आस्थापनेवरील एकूण ३० पदे (०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३)**

| अ.क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता/कार्यकारी अभियंता | २ | २ |
| ३ | सहायक अधीक्षक अभियंता / उप कार्यकारी अभियंता / उप विभागीय अभियंता /अधिक्षक / सहायक अभियंता श्रेणी-१ | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता /सहायक अभियंता श्रेणी-२/ शाखा अभियंता | ३ | ३ |
| ५ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ६ | अधीक्षक | १ | १ |
| ७ | स्वीय सहायक | १ | १ |
| ८ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ११ | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | कनिष्ठ लिपिक/ टंकलेखक | ५ | ५ |
| १३ | वाहन चालक | १ | १ |
| १४ | दूरध्वनी चालक | १ | १ |
| १५ | दप्तरी | १ | १ |
| १६ | नाईक | १ | १ |
| १७ | शिपाई | ३ | ३ |
| १८ | चौकीदार | १ | १ |
| **एकूण** | | **३०** | **३०** |